**राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वीत असलेल्या Health Advice Call Center (टोल फ्रि क्र.१०४) ला सन २०१८-१९ करिता प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
### सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१११८/प्र.क्र.५४९/आरोग्य -७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १६ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-

आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे पत्र क्र.राआसो/पीपीपी/HACCप्रशासकीय मान्यता/१९४६४/२०१८, दिनांक २५ मे, २०१८.

प्रस्तावना :-

Health Advice Call Center (टोल फ्रि क्र.१०४) राज्यात सन २०११ पासून कार्यान्वीत करण्यात आलेले आहेत. या प्रकल्पासाठी केंद्र शासनाने अनावर्ती अनुदान १०० टक्के मान्य केलेले असून आवर्ती (Recurring) अनुदान हे केंद्र शासन (६० टक्के) व राज्य शासन (४० टक्के) यांनी मिळून करावयाचे आहे. केद्र शासनाच्या मंजूरीनुसार राज्य शासनाकडे दरवर्षी आवर्ती खर्चाचा प्रस्ताव पाठविण्यात येतो. केंद्र शासनाकडून आवर्ती अनुदान उपलब्ध न झाल्यास पूर्णपणे आवर्ती खर्च राज्य शासनास करावयाचा आहे.

सद्यस्थितीत हा प्रकल्प जाहिर निविदेद्वारे Turn-key Basis वर राबविण्यात येत आहे. सदरील Health Advice Call Center (Toll Free १०४) ही सेवा दिनांक २८ जानेवारी, २०१२ पासून कार्यान्वित असून सद्यस्थितीत २२ आसन क्षमता (१० आसने आरोग्य सल्ला देण्याकरिता, ६ आसने तक्रार निवारणाकरिता, २ आसने रक्त पुरवठा या करीता, २ आसने मानसिक आरोग्य या करीता आणि २ आसने RKSK या करिता) अशाप्रकारे कार्यरत करावयाचे आहेत. याद्वारे राज्यातील

संपूर्ण आरोग्य सेवा पुरवठादार यांना २४ x ७ आरोग्य सल्ला तसेच सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रमांची माहिती पुरविण्यात येते. त्याचप्रमाणे आरोग्य सेवेबाबत रुग्णाच्या आणि आरोग्य सेवा पुरवठादारांच्या तक्रारींची नोंद करणे, रुग्णांना रक्ताचा पुरवठा वेळेवर व्हावा याकरिता जीवन अमृत (Blood on Call) या सेवेची अंमलबजावणी करणे त्याचप्रमाणे मानसिक आरोग्य आणि RKSK या सेवाकरिता समुपदेशन पुरविण्यात येत आहे. सदर Health Advice Call Center (टोल फ्रि क्र.१०४) ला सन २०१८-१९ मध्ये प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वीत असलेल्या Health Advice Call Center (टोल फ्रि क्र.१०४) साठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये रु.३९७.८५ लक्ष (रुपये तीनशे सत्याण्णव लक्ष पंच्याऐंशी हजार फक्त) इतका खर्च अपेक्षित असल्याने सदर खर्च राष्ट्रीय अभियान अंतर्गत HACC (Toll Free No.१०४) FMR Code १५.९.७ या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या निधीतून खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू Health Advice Call Center (टोल फ्रि क्र.१०४) साठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये काही खरेदी करावयाची झाल्यास सदर खरेदी खालील अटींच्या अधीन राहून करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

१) सदर योजनेंतर्गत आवश्यक असलेल्या बाबींची आवश्यकता / मागणी यांची शहानिशा/ खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू सेवेचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदरहू सेवेच्या तांत्रिक बाबींचे विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/ अधिकारी) मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित सेवेचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे सदरहू सेवेचे दर निविदा प्रक्रियेअंती निश्चित करण्यात यावेत. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) सदर सेवेची नमुना तपासणी करुन उचित व योग्य विनिर्देशीत (specification) सेवा उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे, याची खात्री करण्यात यावी.

६) राज्यातील संपूर्ण आरोग्य सेवा पुरवठादार यांना २४x७ आरोग्य सल्ला, तसेच आरोग्य विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रमाची माहिती पुरविण्यात येते किंवा नाही. त्याचप्रमाणे आरोग्य सेवेबाबत रुग्णांच्या व आरोग्य सेवा पुरवठादारांच्या तक्रारींची नोंद घेतली जाते किंवा नाही. रुग्णांना रक्ताचा पुरवठा वेळेत होतो किंवा नाही, याकरीता जीवन अमृत या सेवेची अंमलबजावणी होते किंवा नाही आणि मानसिक आरोग्य व RKSK या सेवेकरीता समुपदेशन पुरविण्यात येते किंवा नाही इत्यादी बाबींची खातरजमा करण्यात येवून त्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

७) सदरहू योजनेवर होणारा खर्च HACC (Toll Free No.104) FMR Code 15.9.7 या लेखाशिर्षाअंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८) तसेच, या बाबींच्या द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण सेवा पुरवठा प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील या संदर्भातील सेवेशी निगडीत असलेल्या अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) याबाबतची प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर संबंधीत प्राधिकारी यांच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

३. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची तसेच यासंदर्भात काही बाबींची पूर्तता खरेदी करावयाची झाल्यास ती नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित

करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, मुंबई व राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व संबंधित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मध्ये सदरहू सेवेसंदर्भात अथवा बाबींसंदर्भात निगडीत असलेल्या तरतूदींच्या अनुषंगाने मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११५१७०१३७७७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: CN = S. A. Pedgaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance Department
Date: 2018.11.16 11:29:14 +05'30'

**(सु. अ. पेडगांवकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
२) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
३) सहसंचालक (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५) वरिष्ठ सल्लागार, पीपीपी, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)